**आषाढीवारी- २०२४**

आषाढी एकादशी निमित्त **नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज** यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा पुरविण्याच्या कामांना निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-११५७५०६/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१

**दिनांक: ११ जून, २०२५**

**संदर्भ:-**

(१) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक: तिर्थवि-२०२४/प्र.क्र.७७/यो-११ दि. १४.०६.२०२४.

(२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. नाशिक यांचे पत्र जा.क्र.जिपना/ग्रा.पं./योजना-५०५/२०२५ दि. ०५.०६.२०२५.

**प्रस्तावना :-**

मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांच्या २०२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये पुढीलप्रमाणे घोषणा केली आहे; **"संत ज्ञानेश्वर माऊली व संत तुकोबाराय यांचे पालखी सोबतच संत सोपान देव, संत निवृत्तीनाथ व संत मुक्ताई यांचे निर्मलवारी करिता २०.०० कोटी रूपये निधी देण्यात येईल".**

त्यानुषंगाने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये आषाढीवारी-२०२४ करीता नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी जिल्हा परिषद, नाशिक यांना **रु.२,२४,६६,०००/-** इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली होती. तसेच, वितरीत करावयाच्या निधीपैकी ७५ % प्रमाणे रु.१,६८,४९,५००/- (रु. एक कोटी अडुसष्ट लक्ष एकोणपन्नास हजार पाचशे) इतका निधी वितरीत करण्यात आला होता. संदर्भ क्र. २ च्या पत्राव्दारे प्राप्त मागणी नुसार जिल्हा परिषद, नाशिक यांना उर्वरीत निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आषाढीवारी-२०२४ करीता नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी अशा आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी जिल्हा परिषद, नाशिक यांच्या मागणीप्रमाणे उर्वरित **रु. ५६,१६,५००/- (रु. छप्पन्न लक्ष सोळा हजार पाचशे फक्त)** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | नाव | सन २०२४-२५ करिता मंजूर तरतूद रु. | यापूर्वी शासन निर्णय दि.१४.६.२०२४ अन्वये वितरीत निधी (७५%) रु. | वितरीत करावयाचा उर्वरित निधी (२५%) रु. |
|---|---|---|---|---|
| १. | जिल्हा परिषद, नाशिक | रु.२,२४,६६,०००/- (रु.दोन कोटी चोवीस लक्ष सहासष्ट हजार ) | रु.१,६८,४९,५००/- (रु.एक कोटी अडुसष्ट लक्ष एकोणपन्नास हजार पाचशे) | **रु.५६,१६,५००/- (रु.छप्पन्न लक्ष सोळा हजार पाचशे)** |

३. सदर निधी आवश्यक बाबींवरच खर्च होईल याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी दक्षता घ्यावी. सदर निधी व्यवस्थापनास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद जबाबदार असतील.

४. सदर निधी वितरीत करताना, ज्या कामांसाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे त्याच कामांवर खर्च करण्याची जबाबतदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांची राहील. सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास सादर करावीत. वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व निर्मलवारीत (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा) या बाबीवर झालेल्या एकूण खर्चाचा सविस्तर तपशील शासनास सादर केल्यानंतर उर्वरित निधीचे वितरण करण्यात येईल.

५. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००) (०७) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षात खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३२२/२०२५/व्यय-१५ दि. २९.०४.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५ अन्वये अटींची व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६११११३१६२७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701FC3DB9C38A46F4CD82E1E450B51A9E92EEDE8C323934F82EDB538D3B20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.06.11 17:08:19 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
९. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग,नाशिक,
१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक,
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक,
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
१४. अवर सचिव नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
१५. अवर सचिव वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२,
१६. कक्ष अधिकारी, कार्यासन वित्त-१, ग्राम विकास विभाग,
१७. निवड नस्ती (का.यो-११).